राज्यात उत्पादित होणाऱ्या मळीची
निर्यात नियंत्रणमुक्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन शुद्धीपत्र क्रमांक : एमपीएल-१२१३/प्र.क्र.५५९/राउशु-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ जुलै, २०१८.

**वाचा :-** शासन निर्णय, समक्रमांक, दि.४ जानेवारी, २०१६.

**शासन शुद्धीपत्र** :-

राज्यात उत्पादित होणाऱ्या मळीचे परराज्यात / परदेशात निर्यातीस प्रचलित नियम आणि सदर शासन निर्णयामध्ये नमूद बाबींची पूर्तता करून परवानगी देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

राज्यातील मळी निर्यात घटकाकडून मळी साठवणूक करण्यासाठी निश्चित करण्यात येणारे ठिकाण, या ठिकाणावरून राज्यातील जवळच्या बंदरावर वाहतूक करण्यासाठी येणारा वाढीव खर्च व त्या तुलनेत अन्य राज्यातील जवळच्या बंदरातून परदेशातील होणारी किफायतशीर निर्यात विचारात घेता, इंधन व प्रदूषण हानी टाळण्याच्या दृष्टीकोनातून संदर्भाधीन शासन निर्णय, दि.४ जानेवारी, २०१६ मधील (ब) (१०) मध्ये पुढील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

ब) (१०) "परदेशातील निर्यात शक्यतो राज्यातील बंदरातून करणे अभिप्रेत आहे. तथापि, याबाबत घटकांनी विनंती केल्यास परराज्यातील बंदरातून निर्यातीस वस्तुस्थितीनुसार शासनस्तरावर निर्णय घेण्यात येईल."

२. सदर शासन शुद्धीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०७०४१७०५१५२३२९ असा आहे. हे शुद्धीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.07.16 15:18:03 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) मा.मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४) मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५) मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

६) प्रधान सचिव (राउशु), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२३,
९) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे,
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१२) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
१३) निवड नस्ती.